**कोषागारात व अधिदान व लेखा कार्यालयात सादर होणाऱ्या देयकांची संख्या कमी करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०११/प्र.क्र.३/कोषा.प्र.५**
**दिनांक ५ फेब्रुवारी, २०११.**

**संदर्भ :-** वित्त विभाग, शासन निर्णय क्र. मआखा-१०.०७/प्र.क्र.६५/२००७/विनियम, दिनांक २२ जानेवारी, २००८.

**प्रस्तावना** :- राज्यातील कोषागारात / अधिदान व लेखा कार्यालयास विविध शासकीय कार्यालयाच्या सुरळीत परिचलनाच्या दृष्टीने आवश्यक खर्चाच्या बाबीशी संबंधित देयके मोठया प्रमाणावर सादर केले जातात. मागील २ वर्षातील अशा देयकांची संख्या १.८० लाखापेक्षा जास्त आहे, असे आढळून आले आहे. अशा देयकांना पारित करण्यासाठी मोठया प्रमाणावर मनुष्यबळ लागते. तसेच देयकांची साठवणूक करण्यासाठी जागा उपलब्ध करुन दयावी लागते तसेच जास्त देयकांचे लेखांकन करण्यास जास्त वेळ खर्ची पडते. वरिल बाबींचा विचार करता अशी देयके कोषागारात सादर न करता ती संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या स्तरावरच प्रदान करुन निकाली काढणे योग्य होईल. याचा विचार करुन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** :-

उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये शासनाने राज्यातील सर्व आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना विभाग प्रमुखांच्या कार्यालयासाठी रु. २५०० पर्यंत स्थायी अग्रिमाची रक्कम तसेच विभाग प्रमुखांच्या अधिनस्त दुय्यम कार्यालयासाठी रु. १००० पर्यंतची रक्कम मंजूर करतील असे प्रयोजन केले आहे.

यापुढे रु. १०००/- व त्यापेक्षा कमी रकमेच्या प्रदानांची देयके कोषागारात/ अधिदान व लेखा कार्यालयात सादर करण्यात येऊ नये. अशी देयके कोषागाराने स्विकारु नयेत. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी त्यांच्या स्तरावरुन स्थायी अग्रिमाच्या रकमेतून सदर प्रदाने करावी. स्थायी अग्रिमाच्या रकमेतून करावयाच्या प्रदानांची यादी पुढीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | प्रदानाचा प्रकार |
|---|---|
| १ | कार्यालयीन खर्च |
| २ | टेलिफोन, वीज आणि पाणी खर्च |

३ भाडेपट्टी व कर
४ इतर प्रशासकीय खर्च
५ संगणक खर्च
६ वस्तु व पुरवठा
७ इंधनावरील खर्च
८ जाहिरात व प्रसिध्दी
९ व्यावसायिक सेवा
१० मोटारगाड्यावरील खर्च
११ इतर आकार
१२ संविदात्मक सेवा (contractual services)
१३ प्रकाशने
१४ यंत्र व साधने
१५ पुरस्कार (Rewards)
१६ इतर किरकोळ खर्च (कर्मचाऱ्यांचे प्रदाने सोडून)

वरील प्रमाणे कार्यवाही करणे शक्य व्हावे याकरिता सर्व कार्यालय प्रमुखांनी संदर्भांकित शासन निर्णयाप्रमाणे स्थायी अग्रिमाची व्यवस्था करुन घ्यावी. कोषागाराने / अधिदान व लेखा कार्यालयाने स्थायी अग्रीमाची देयके अग्रक्रमाने पारित करावी.

सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असुन त्याचा संगणक संकेतांक २०११०२१४१५१४३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स.अ.मु.नकवी)
उप सचिव, वित्त विभाग

प्रति,
राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
मंत्रालयीन सर्व विभाग
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख
प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई
प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा कोकण भवन नवी, मुंबई
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई / पुणे/ नागपूर/ औरंगाबाद /नाशिक/ अमरावती.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
सर्व उप कोषागार अधिकारी
प्रबंधक , सर्व अनुदानित कृषि व अकृषि विद्यापीठे,
बहूजन समाज पार्टी, डी-१ इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई-१

सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
सह संचालक, लेखा व कोषागारे, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती, औरंगाबाद, कोकण भवन, नवी मुंबई.
भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ., बँरक क्रमांक १, योगक्षेम समोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई-२०
भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४, राजभुवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई-४
भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-१३
इंडियन नॅशनल काँग्रेस, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस(आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई-२५
नॅशनलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट ,मुंबई-२१
शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-२८
सर्व सर्व विधानपरिषद सदस्य / सर्व विधानसभा सदस्य.
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (कोषा प्र ५)

----------